समग्र शिक्षा अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण (Teacher Education) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षासाठी राज्य हिस्सा (General) वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: डायट-२०२१/प्र.क्र.३२/प्रशिक्षण भाग-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : १६ मार्च, २०२२

वाचाः-१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.०३/०२/२०२२

२) राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र यांचे पत्र क्र. राशैसंप्रपम /सेवापूर्व शिक्षण/ कक्ष-३/२०२१-२२/८०५, दि.१५.०२.२०२२

**प्रस्तावनाः-**

समग्र शिक्षा अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण (Teacher Education) ही योजना केंद्र पुरस्कृत योजना असून या योजनेसाठी केंद्र शासन ६०% व राज्य शासन ४०% निधी उपलब्ध करून देते. यामधून राज्यातील जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थामधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन अदा करण्यात येते. सदर योजनेसाठी कार्यरत पदांचे वेतन अदा करण्यासाठी राज्य हिस्सा **(General)** लेखाशीर्ष २२०२ आय ६१२ अंतर्गत ०१ वेतन उद्दिष्टाखाली अनुज्ञेय निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासननिर्णयः-**

राज्यातील जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थेतील नियमित शिक्षकांच्या वेतनासाठी आणि अन्य कर्मचारी, ज्यांचे वेतन सेवार्थ प्रणालीमधून होते, त्यांचे वेतनावरील खर्च भागविण्यासाठी ०१, वेतन या उद्दिष्टाखाली सुधारित अंदाजाद्वारे मंजूर केलेल्या तरतूदीपैकी रु. ३,५३,७४,८००/- (रुपये तीन कोटी त्रेप्पन्न लाख चौऱ्याहत्तर हजार आठशे फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षातंर्गत तरतुदीमधून वितरीत करण्यात येत आहे.

(General Head) **सर्वसाधारण लेखाशीर्ष**

| उद्दिष्ट | लेखाशिर्ष | वितरीत तरतुद |
|---|---|---|
| | **राज्य हिस्सा (२२०२।६१२)** | **रु.३,५३,७४,८००/-** |

२. उपरोक्त खर्च मागणी क्र. ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण १०६, शिक्षक आणि इतर सेवा , (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (२२०२ । ६१२ )सर्वसाधारण, (राज्य हिस्सा ४० टक्के) या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर ०१ वेतन या उद्दिष्टाखालील तरतुद, नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, शिक्षण यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ६ एप्रिल,२०२१, २४ जून,२०२१, २१ ऑक्टोबर २०२१ व दिनांक ३ फेब्रुवारी,२०२२ च्या शासन परिपत्रकातील तसेच आनुषंगिक परिपत्रकांच्या सूचनांनुसार करण्यात यावा.

४. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर वितरीत निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच सदर खर्चाचा अहवाल, उपयोगिता प्रमाणपत्र इत्यादींची माहिती प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा व शालेय शिक्षण व क्रीडा विभागास आयुक्त, शिक्षण व संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, यानी पाठवावी. सदर खर्च समग्र शिक्षा अभियान कार्यालयाच्या लेख्यांमध्ये प्रतिबिंबित होणे आवश्यक असल्याने या लेखाशीर्षाखालील जमा व खर्च याची माहिती समग्र शिक्षा अभियान कार्यालयाने Public Finance Management System (PFMS ) या प्रणालीवर नोंदवावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०६/२०२२/व्यय-५ दि.१०/०३/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३१६१८०९१८५२२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4,
serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a,
cn=Swati Madhukar Nanal
Date: 2022.03.17 17:28:08 +05'30'

**( स्वाती नानल )**

**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण ), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र शासन, पुणे
८. राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा अभियान, चर्नीरोड, मुंबई.
९. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य,पुणे
१२. संचालक (प्रौढ व अल्पसंख्याक) महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर
१४. महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१५. सर्व प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (DIET)
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई.
१९. अर्थसंकल्प कार्यासन, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी मंजूर रक्कम बी.डी.एस.प्रणालीवर तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.
२०. निवडनस्ती (प्रशिक्षण).